भुकेल्या पहाडावरील
मांजर
मराठी : अश्विनी बर्वे

भुकेल्या पहाडावर एक धनवान मांजर देव राहत होता. ज्याच्याजवळ सगळं काही असून सुद्धा त्याला वाटे की तेवढं पुरेसं नाही. आपल्या इच्छांची पूर्ती व्हावी म्हणून त्याने एका प्रसिद्ध आर्किटेक्टकडून जगातील सगळ्यात उंच पगोडा करून घेतला. तो जगातल्या सगळ्यात प्रसिद्ध अशा शिंप्याकडून स्वतःसाठी रेशम आणि सोन्याच्या धाग्यापासून आपले कपडे शिवून घेत असे. तो सगळ्यात नावाजलेल्या आचाऱ्याकडून स्वतःसाठी पक्वान्न करून घेत असे. त्यासाठीचे तांदूळ देवाच्या स्वतःच्या शेतातून येत असत. यापेक्षा अधिक काय हवं?को

पण जेव्हा दुष्काळ पडला तेव्हा मांजर-देवाला आयुष्यात प्रथमच तंगी जाणवली. मग तो पहाडा वरून उतरून खाली आला. त्याने तिथं जे पाहिलं त्यामुळे त्याचं जीवन कायमस्वरूपी बदलून गेलं.

भुकेल्या पहाडावर एक धनवान मांजर-देव राहत होते. त्याच्याजवळ सगळं काही होते तरीपण ते समाधानी नव्हते.

विश्वातल्या सगळ्यात कुशल अश्या मजुरांनी त्याच्यासाठी जगातील सगळ्यात ऊंच पगोडा बांधला होता. तो त्यातच राहत असे.प्रत्येक मनुष्याच्या वर.

त्याने जगातल्या सगळ्यात प्रसिद्ध अशा शिंप्याकडून स्वतःसाठी रेशम आणि सोन्याच्या धाग्यापासून आपले कपडे शिवून घेतले होते.

शिकारी त्याला सर्वात  स्वादिष्ट मांस भेट देत असत. सगळ्यात नावाजलेला आचारी त्याच्यासाठी उत्कृष्ट जेवण आणि पक्वान्न तयार करत. त्यासाठीचा तांदूळ प्रत्यक्ष देवाच्या शेतातून येत असे.

मांजर-देवाचे नोकर जेव्हा जेवण संपवण्याविषयी त्याला विचारत तेव्हा तो त्यांचावर ओरडत असे, “तुम्ही आंधळे आहात का? की तुम्हांला दिसत नाही माझे जेवणाचे ताट अर्धे रिकामे आहे?ते घेवून जा.”

भुका पहाड त्याच्या स्वादिष्ट तांदुळासाठी प्रसिद्ध होता.मजूर तांदूळ खूप कष्टाने आणि प्रेमाने उगवत असत. मग इतर मजूर ते तांदूळ नदीच्या वाहत्या पाण्यात धूत असत.

मांजर-देव आपल्या पगोडा मध्ये उभा राहून त्यांच्यावर ओरडत असे. “लवकर आटपा! अजून पुष्कळ भात कापायचा आहे!”

भुकेल्या पहाडावर अशाच प्रकारे आयुष्य चालू राहिले असते.पण एकदा दुष्काळ पडला. आठवडे-महिने बदलले. महिने वर्षात बदलले. पण एक थेंबही पाऊस पडला नाही. शेतकऱ्यांचे पीकच काय बी सुद्धा जळून गेले. मांजर–देवाची शेती सुद्धा सुकून गेली. गाववाले भुकेने व्याकूळ झाले. पण भरपूर श्रीमंती मुळे मांजर-देवाने आपली अय्याशी चालू ठेवली.

मग पुढच्या वर्षी सुद्धा दुष्काळ पडला. अन्नाच्या अभावाने सगळे गाववाले पहाड सोडून खाली शहरात गेले. तिथं रोजी-रोटी कमावणे सोप्पे होते.

मांजर-देवाची धन-दौलत आता काहीच कामाची नव्हती. त्याने तिथं उंचावर पगोडा बांधला  होता पण  सोन्याच्या धाग्याने कपडे शिवणारा कोणी माणूस आता तिथं राहिला नव्हता.

याशिवाय मांजर–देव पहाडावर चिटकून राहिला. धन-दौलत, शान-शौकत शिवाय आयुष्याची कल्पना करणे त्याला अवघड होते.

शेवटी अन्नाच्या अभावामुळे मांजर-देवाला सुद्धा आपलं घरद्वार आणि पहाड सोडायला लागला त्यानंतर तो आपल्या राज्यात भीक मागायला निघाला. पण त्याला मदत करण्यासाठी कोणी राहिले नव्हते.

म्हणून तो मैलोगणिक एकटा भटकत राहिला.

शेवटी त्याला आपल्या सारखेच दोन भिकारी भेटले. ते शेकोटीजवळ शेकत बसले होते.

त्यांनी मांजर-देवाला त्या भिक्षुच्या बाबत सांगितले होते जो भुक्या लोकांना मोफत खाणं देत असे. भिक्षु जवळच एका छोट्या मंदिरात राहत होता. भिकारी, मांजर-देवाला त्या मंदिरापर्यंत घेवून जायला तयार होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते मंदिराकडे गेले. तिथं भुकेल्या लोकांची लांब रांग लागली होती. सगळे लोक अन्नाची वाट बघत होते.

शेवटी मांजर-देवाचा नंबर आला. भिक्षुने मांजर-देवाच्या भांड्यात एक चमचा गरम भात घातला. त्याने भांडं अर्ध भरलं.

मांजर-देवाने याआधी इतका मन लावून आणि समाधानाने भात कधीच खाल्ला नव्हता.

“मी तुम्हांला विचारू शकतो का?” मांजर-देवाने भिक्षूला विचारलं.“ आपल्याला या संकटाच्या काळात इतका छान, सुगंधी तांदूळ कुठे मिळाला?”

भिक्षुने एक दीर्घ श्वास घेत म्हटलं,” “मी खूपच भाग्यशाली आहे कारण मी भुकेल्या – पहाडाच्या खाली राहत होतो.पहाडावर राहणारं धनवान मांजर-देव आपला तांदूळ निष्काळजीपणे नदीत धूत असे. त्यामुळे खूप सारा तांदूळ प्रवाहांबरोबर वाहत माझ्या शेतात येत असे. अनेक वर्षांपासून तो तांदूळ मी जमा केला आहे. आता माझ्याजवळ इतका तांदूळ आहे की मी हजार दिवसांत सुद्धा संपवू शकत नाही. म्हणून भुकेल्या माणसांना तो वाटण्यात मला खूप आनंद मिळतो आहे.

मांजर-देवाने आपल्या भांड्यात बघितलं, तेव्हा त्याच्या लक्षात आलं की त्याने फेकलेलाच तांदूळ तो खात आहे. जीवनात प्रथमच त्याला खऱ्या परोपकाराचा अर्थ समजला.

आज सुद्धा भुकेल्या पहाडाच्या खाली एक मंदिर दिसेल. तिथे तुम्ही मांजराच्या आकारा इतके भांडं बघाल.आणि त्या भांड्यात एक चिट्ठी असेल, ती तुम्ही काढून वाचू शकतात,त्यावर लिहलेलं असेल, " पुरेसे म्हणजे किती हे फक्त मलाच माहीत आहे."

कल्डीकाट मेडलने सम्मानित एड यंग ने ८० पेक्षा अधिक बाल-पुस्तकांसाठी चित्रं काढली आहेत.त्यातील १७ पुस्तके त्याने स्वतः लिहली. एड यंगचा जन्म, चीन मध्ये झाला होता. त्याचे संगोपन शांघाय मध्ये झालं. मग ते हॉगकॉग मध्ये शिकले. आपल्या तारुण्यात अमेरिकेत एड यंग आर्किटेक्चर शिकण्यासाठी आले,पण तिथं त्यांचं मन लागलं नाही. १९९० मध्ये त्यांचे पुस्तक *लोन-पो-पो* ला कल्डीकाट मेडल मिळाले. त्यांच्या दोन पुस्तकांना – *द एम्परर एंड द काइट आणि सेवन ब्लाइंड माइसला* कल्डीकाट सन्मान मिळाला. ते न्यू-यॉर्क मध्ये राहत आहेत.